मौजे बोडणी, ता. अलिबाग, जि. रायगड येथील प्रकल्पासाठी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांकः मत्स्यवि १११९/प्र.क्र.१३७/पदुम १४**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १२ ऑक्टोबर, २०२१

**संदर्भ -**

कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. मत्स्यवि २०१६/प्र. क्र. १५९/पदुम १३, दि. ०६.०३.२०१७

**प्रस्तावना :**

केंद्र पुरस्कृत नीलक्रांती योजना राज्यात राबविण्यास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयाच्या तक्त्यातील अ. क्र. १६ येथे “मासेमारी बंदर व मासे उतरविणाऱ्या केंद्रावर जेट्टींचे नविन बांधकाम” या उप-योजनेचा समावेश करण्यात आला असुन त्यासाठी रू. ८००.०० लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर उप योजनेंतर्गत मौजे बोडणी, ता. अलिबाग, जि. रायगड येथील कामाचा समावेश करण्यात आला आहे. उक्त कामासाठी निधी वितरीत करण्यासाठी स्वतंत्रपणे लेखाशीर्षे घेण्यात आली आहे. सदर कामासाठी आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांच्या स्तरावरून निविदा प्रक्रिया राबविण्यात आली होती. सदर निविदेमध्ये स्कायपार्क इन्फ्रा प्रोजेक्टस प्रायव्हेट मर्या., यांची रु. ६६४.७१ लक्ष रकमेची निविदा अंतिम करण्यात येऊन कार्यारंभ आदेश देण्यात आले.

सद्यस्थितीत सदर प्रकल्पाचे काम प्रगतीपथावर असून प्रकल्पासाठी घेण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ मध्ये निधी अर्थसंकल्पित नसल्यामुळे मत्स्यव्यवसाय विभागाकडे उपलब्ध असलेल्या लेखाशीर्षातून सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुद्धीपत्रक -**

केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत {केंद्र : राज्य (५० टक्के : ५० टक्के)} मौजे बोडणी, ता. अलिबाग, जि. रायगड येथील प्रकल्पासाठी रू. ६६४.७० लक्ष (अक्षरी रू. सहा कोटी चौसष्ट लाख सत्तर हजार मात्र) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. सदर योजनेसाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

| केंद्र हिश्याच्या निधीसाठीचे लेखाशीर्ष | राज्य हिश्याच्या निधीसाठीचे लेखाशीर्ष |
|---|---|
| मागणी क्र. डी ०९,<br>४४०५ -मत्स्यव्यवसायावरील भांडवली खर्च,<br>(००) (१०३) सागरी मत्स्यव्यवसाय,<br>(०१) (०७) -लहान मासेमारी बंदरे बांधकाम, (५० टक्के केंद्र हिस्सा)<br>५३-मोठी बांधकामे (४४०५ ३४०७) | मागणी क्र. डी ०९,<br>४४०५-मत्स्यव्यवसायावरील भांडवली खर्च,<br>(००) (१०३) सागरी मत्स्यव्यवसाय,<br>(०१) (०८) -लहान मासेमारी बंदरे बांधकाम, (५० टक्के राज्य हिस्सा)<br>५३-मोठी बांधकामे (४४०५ ३४१६) |

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४२७/२०२१/व्यय-२, दि. २२.०९.२०२१ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२११०२०११०८५४४१०१ असा आहे. हे शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY JAGANNATH SAVANE

Digitally signed by SANJAY JAGANNATH SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eecf658e3610fa137d1ea1fd3304d639f1d5384d08303b49875a1fb41cb9c5b8, pseudonym=BE10EB938AF079487419C9BFE07F030E4670A798, serialNumber=86F57086A2BEEC37477C2F6210FB8A27626CA243A845EA1A73F70CF31BE98102, cn=SANJAY JAGANNATH SAVANE
Date: 2021.10.20 11:13:55 +05'30'

**( सं. ज. सवने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय , मुंबई
८. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी/ उप कोषागार अधिकारी,, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड,
१२. रत्नागिरी व सिंधुदुर्ग
१३. सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१४. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (पदुम १२, पदुम १४, पदुम १६)
१५. कक्ष अधिकारी (व्यय/अर्थसंकल्प) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवडनस्ती.